कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरिता (TRFA-Pluses) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी१०५)
राज्य हिस्सा(लेखाशिर्ष २४०१बी११४)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र. ५ /अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २१ जानेवारी, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. एफ नं २०-२७/२०१७-एनएफएसएम (सीए-व्ही) दि. २८/०६/२०२१
५) कृषि व पदुम विभाग नस्ती क्र.असुअ २०२१/प्र.क्र १०७/४-अे

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरिता (TRFA-Pluses) कार्यक्रम या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१-पीक संवर्धन, (००) (७८९)-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०३) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके केंद्र हिस्सा (२४०१B१०५) या लेखाशिर्षाखाली रु.२१००.०० लाख समरुप (०१) (०४) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके राज्य हिस्सा (२४०१B११४) या लेखाशिर्षाखाली रु.१४००.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे. केंद्र शासनाच्या २८ जून, २०२१ च्या पत्रान्वये सन २०२१-२२ करीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता पहिल्या हप्त्यापोटी एकूण ३३७२.६५ लाख इतका निधी वितरीत करण्यात आला त्यापैकी अनुसूचित प्रवर्गाकरीता (०१) (०४) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके केंद्र हिस्सा (२४०१B१०५) या लेखाशिर्षाखाली रु.३४४.०३ लाख समरुप राज्य हिस्सा (२४०१B११४) या लेखाशिर्षाखाली रु.२२९.३४ लाख एवढा निधी मंजूर आहे.

राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन वित्त विभागाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.१,२ व ३ च्या शासन निर्णयान्वये अन्वये वित्त विभागाने कार्यक्रमांतर्गत योजनांच्या खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरिता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन व कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील नस्तीवरील प्रस्तावास अनुसरुन केंद्र हिस्सा (२४०१B१०५) या लेखाशिर्षाखाली रु.३४४.०३ लाख तसेच राज्य हिस्सा (२४०१B११४) या लेखाशिर्षाखाली रु.२२९.३४ लाख असा एकूण रु.५७३.३७ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणू प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.६.४.२०२१,२४.६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.६.४.२०२१,२४.६.२०२१ व १४.१०.२०२१ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३६८/२०२१/ व्यय-१ दि. २७/१२/२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२५१२५११३३१२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2022.01.25 12:52:49 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव, कृषी व पदुमण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग